**दिनांक ५ ते ११ डिसेंबर, २०१६ या कालावधीत जयपूर, राजस्थान येथे आयोजित अखिल भारतीय नागरी सेवा लॉन टेनिस स्पर्धा (२०१६-१७) मध्ये महाराष्ट्राचा संघ सहभागी होण्यासाठी होणाऱ्या खर्चास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक- अभानासे - ३८१६ /प्र.क्र.२०६/क्रीयुसे-२,**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

दिनांक :- ०५ डिसेंबर, २०१६

वाचा :- (१) केंद्रीय नागरी सेवा, सांस्कृतिक कार्य आणि क्रीडा मंडळ क्रमांक- ५९/०२/२०१६ -१७ /सीसीएससीएसबी यांचे दिनांक ८.११.२०१६ चे पत्र.

(२) सचिवालय जिमखान्याचे पत्र क्र.-अभानासे/ लॉन टेनिस /२०१६-१७, दि.२५.११.२०१६

(३) उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा, मुंबई विभाग, मुंबई यांचे क्रमांक-उपसंक्री/अभानासे/ १६-१७/का-४/२२०६, दि.३०.११.२०१६ चे पत्र.

**: शासन निर्णय:**

दिनांक **५ ते ११ डिसेंबर, २०१६ या कालावधीत जयपूर, राजस्थान** येथे आयोजित करण्यात आलेल्या अखिल भारतीय नागरी सेवा लॉन टेनिस स्पर्धा २०१६-१७ मध्ये भाग घेण्यासाठी महाराष्ट्र शासनाचा संघ निवडण्याकरिता श्री शिवछत्रपती क्रीडा संकुल, बालेवाडी, पुणे येथे दिनांक २४.११.२०१६ रोजी निवड चाचणी आयोजित करण्यात आली होती. या चाचणीमध्ये सहभागी झालेल्या अधिकारी व कर्मचा-यांची यादी सोबतच्या विवरणपत्र "क" प्रमाणे तर निवड चाचणीद्वारे निवडण्यात आलेल्या राज्याचा संघ विवरणपत्र "अ" प्रमाणे आहे. सदर स्पर्धेची निवड चाचणी, प्रशिक्षण शिबीर तसेच राज्य संघाच्या सदर स्पर्धेतील सहभागासाठी विवरणपत्र "ब" प्रमाणे **रु. ६५,९००/- (रुपये पासष्ट हजार नऊशे फक्त)** इतक्या खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

२. उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा, मुंबई विभाग, मुंबई यांना सदर रक्कम आहरीत करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. संघातील ज्या खेळाडूंना किट बॅग्ज व ट्रॅकसूट मिळालेले आहेत ते खेळाडू कोणत्याही अखिल भारतीय नागरी सेवा क्रीडा स्पर्धेसाठी किटबॅग व ट्रॅकसूट दोन वर्षातून एकदा मिळण्यास पात्र ठरतील. या नियमाचे सचिवालय जिमखान्याने काटेकोरपणे पालन करावे.

४. स्पर्धेत सहभागी होण्यासाठी संबंधित विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख यांनी खेळाडू प्रशिक्षक / व्यवस्थापक यांना दिनांक १.१२.२०१६(म.पू.) पासून कार्यमुक्त करावे या खेळाडूंनी दिनांक १.१२.२०१६ ते ३.१२.२०१६ या कालावधीतील प्रशिक्षण शिबिरासाठी व संघात निवड झालेल्या खेळाडूंच्या सेवा दिनांक ४.१२.२०१६ (म.नं.) पासून सचिवालय जिमखान्यात उपलब्ध करून देण्यात याव्यात तसेच त्यानंतर खेळाडूंनी दिनांक ५.१२.२०१६ ते ११.१२.२०१६ या कालावधीतील स्पर्धेत उपस्थित राहावे. संघातील प्रत्येक खेळाडूने व व्यवस्थापकाने ते ज्यांच्या अधिपत्याखाली काम करीत असतील त्या विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांची परवानगी मिळविणे आवश्यक आहे.

५. संघातील खेळाडू, प्रशिक्षक व व्यवस्थापक यांची प्रशिक्षण शिबीर व स्पर्धा काळातील कार्यालयीन अनुपस्थिती ही शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-एलव्हीई-१४८५/प्र.क्र.८३३/ अ/सेवा-९, दिनांक ११ मे, १९८९ व क्रमांक-एलव्हीई/१४९२/४६/सेवा-९, दिनांक ३० जुलै, १९९२ अन्वये "कर्तव्य कालावधी" म्हणून समजण्यात यावा. तसेच स्पर्धा संपल्यानंतर एक दिवसानंतर खेळाडूंनी मुख्यालयास परत यावे. या सर्वाचा प्रवास भत्ता, दैनिक भत्ता व इतर भत्ते यावर होणारा खर्च संबंधित विभागाच्या / कार्यालय प्रमुखांच्या मुख्य लेखाशिर्षाखाली असणा-या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. स्पर्धेच्या निवड चाचणीसाठी उपस्थित अधिकारी / कर्मचारी (विवरणपत्र-क) यांची कार्यालयीन अनुपस्थिती शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-एलव्हीई/१४९२/४६/सेवा-९, दिनांक ३० जुलै,१९९२ अन्वये कर्तव्यार्थ म्हणून समजण्यात यावी व मुंबई बाहेरील खेळाडूंना अनुज्ञेय असलेला प्रवास / दैनिक भत्ता व इतर सवलती या वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक- एलव्हीई-१४८५/प्र.क्र.८३३/अ/सेवा-९, दिनांक ११ मे, १९८९ व वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक-एलव्हीई-१४०४/प्र.क्र.८/अ/सेवा-८, दिनांक २७ फेब्रुवारी, २००४ अन्वये विशेष बाब म्हणून मंजूर करण्यात यावी.

या सवलतीचा लाभ मिळण्यासाठी निवड चाचणीसाठी उपस्थिती असणा-या अधिकारी व कर्मचारी यांच्या उपस्थितीबाबत मानद सचिव, सचिवालय जिमखाना यांनी दिलेले प्रमाणपत्र संबंधित कर्मचा-यांनी त्यांच्या आस्थापना कार्यासनाला सादर करणे आवश्यक राहिल.

७. सचिवालय जिमखान्याने प्रत्यक्ष खर्चाचे विवरणपत्र कोणत्याही परिस्थितीत आदेशाच्या दिनांकापासून १५ दिवसाच्या आत आयुक्त, क्रीडा व युवकसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे तसेच उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा, मुंबई विभाग, मुंबई यांना स्पर्धेत केलेल्या खर्चाच्या अहवालासोबत सादर करावे. तसेच जर रक्कम शिल्लक राहिली तर ती उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा, मुंबई विभाग, मुंबई यांना त्वरीत परत करण्यात यावी.

८. यासाठी होणारा खर्च सन २०१६-१७ या आर्थिक वर्षासाठी “२२०४ क्रीडा व युवक सेवा, १०४ क्रीडा व खेळ, (०६) अखिल भारतीय नागरी सेवा स्पर्धा, (०६)(०२) अखिल भारतीय नागरी सेवा स्पर्धेत सहभाग (२२०४ १९८१), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)” या लेखाशीर्षाखाली अर्थसंकल्पित तरतूदीतून भागविण्यात यावा.

९. सचिवालय जिमखाना यांच्याकडून स्पर्धेचा अहवाल, बाबनिहाय प्रत्यक्ष झालेल्या खर्चाचा तपशील, विनियोग प्रमाणपत्र, परिक्षित लेखा विवरणपत्र व मंजूरी आदेशातील सर्व अटींची पूर्तता करण्याच्या अटीवर विवरणपत्र "ब" प्रमाणे खर्चास मंजूरी देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२०५१६४७५६९९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Charushila D Chaudhari

Digitally signed by Charushila D Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b99d7dca0e63be1bd1b7158b95235 37dcc1d46bc807768647a9ed4ff3816ecf3, cn=Charushila D Chaudhari
Date: 2016.12.05 16:50:19 +05'30'

**(चारुशीला चौधरी)**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त, क्रीडा व युवकसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा, पुणे विभाग, पुणे
३. उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा, मुंबई विभाग, मुंबई,
४. जिल्हा क्रीडा अधिकारी, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई-४०० ०२१.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
७. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
८. वित्त विभाग (व्यय-११), मंत्रालय, मुंबई.
९. मानद महासचिव, सचिवालय जिमखाना, मुंबई-४०० ०३२ (५ प्रती)
१०. संबंधित अधिकारी व कर्मचारी यांचे कार्यालये (सचिवालय जिमखान्यामार्फत)
११. निवड नस्ती (क्रीयुसे-२).

## विवरणपत्र "अ"

दिनांक ५ ते ११ डिसेंबर, २०१६ या कालावधीत जयपूर (राजस्थान) येथे आयोजित करण्यात आलेल्या अखिल भारतीय नागरी सेवा लॉन टेनिस स्पर्धा २०१६-१७ मध्ये महाराष्ट्र शासनाच्या लॉन टेनिस संघाचे प्रतिनिधीत्व करणाऱ्या स्पर्धकांची नावे दर्शविणारे विवरणपत्र. साठी होणाऱ्या खर्चाचे विवरणपत्र.

| | खेळाडूंचे नाव व पदनाम | ट्रॅक सूट | किटबॅग | विभाग कार्यालय / |
|---|---|---|---|---|
| १ | श्री. नरेंद्र सोपल,<br>सह संचालक | नाही | नाही | आयुक्त, क्रिडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे. |
| २ | श्री. तानाजी शिन्दे,<br>अतिरिक्त आयुक्त | नाही | नाही | आयुक्त, पिंपरी चिंचवड म्युनिसिपल कॉर्पोरेशन, पुणे. |
| ३ | श्री. संजय पाटील,<br>उप जिल्हाधिकारी | होय | होय | जिल्हाधिकारी कार्यालय, पुणे |
| ४ | श्री. उल्हास फुलझेले,<br>शाखा अभियंता | नाही | नाही | मृद यांत्रिकी रेफरळ प्रयोगशाळा, मेरी, नाशिक, जिल्हा- नाशिक. |
| ५ | श्री. राजाराम शि. देवकर,<br>प्रतिवेदक | नाही | नाही | अधिपरिक्षक, पुस्तके व प्रकाशने, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, जुने जकात घर, फोर्ट, मुंबई. |
| ६ | श्री. प्रशांत का. मेंगळ,<br>टेनिस बॉय | नाही | नाही | राज्यपालाचे परिवार प्रबंधक कार्यालय, राजभवन, वाळकेश्वर, मुंबई. |
| ७ | श्री. जी.बी. नन्नोर | होय | होय | लघु पाटबंधारे विभाग II, संगमनेर (घुलेवाडी) जिल्हा- अहमदनगर |
| ८ | श्री .प्रमोद सावंत<br>प्रशिक्षक | होय | होय | जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| ९ | श्री. प्रकाश चौधरी<br>व्यवस्थापक | होय | होय | सचिवालय जिमखाना, मानद सह सचिव तथा मानद सचिव, लॉन टेनिस. |

Charushila D Chaudhari

Digitally signed by Charushila D Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b99d7dca0e63be1bd1b7158b9523537dcc1d46bc807768647a9ed4ff3816ecf3, cn=Charushila D Chaudhari
Date: 2016.12.05 16:50:45 +05'30'

(चारुशीला चौधरी)
उपसचिव, महाराष्ट्र शासन

## विवरणपत्र "ब"

दिनांक ५ ते ११ डिसेंबर, २०१६ या कालावधीत जयपूर (राजस्थान) येथे आयोजित करण्यात आलेल्या अखिल भारतीय नागरी सेवा लॉन टेनिस स्पर्धा २०१६-१७ मध्ये महाराष्ट्र शासनाच्या लॉन टेनिस संघासाठी होणाऱ्या खर्चाचे विवरणपत्र.

| क्र. | तपशील | रक्कम |
|---|---|---|
| अ) | **निवड चाचणी** | |
| १ | निवड चाचणीपूर्वीचा खर्च. | ५००/- |
| ब) | **निवड चाचणी आयोजनाचा खर्च.** | |
| १ | प्रमुख पंच यांचे मानधन व प्रवास खर्च. | २,०००/- |
| २ | चार सदस्यांकरिता पुणे येथे जाण्या-येण्यासाठी झालेला खर्च. | ३,०००/- |
| ३ | निवड चाचणीस उपस्थित जिमखाना पदाधिकारी/ प्रितिनिधी व पंच यांच्याकरिता चहा/ अल्पोपहारावरील खर्च. (पुणे येथे) | २,०००/- |
| ४ | निवड चाचणीसाठी २ डझन लॉन टेनिस चेंडू.७८०) x२( | १,५६०/- |
| ५ | प्रथोमोपचार साहित्य. | ५००/- |
| क) | **प्रशिक्षण शिबीर.** | |
| १ | ३ दिवसाच्या प्रशिक्षण शिबीराकरिता खेळाडू, व्यवस्थापक/ प्रशिक्षक यांच्या चहा व अल्पोपहार व जेवणावरील खर्च. (बालेवाडी, पुणे येथे) | ४,०००/- |
| २ | प्रशिक्षकाचे मानधन. | १,५००/- |
| ३ | ३ डझन लॉन टेनिस चेंडू. (७८०x३) | २,३४०/- |
| ४ | औषधे (रेली स्प्रे) व किरकोळ. | ५००/- |
| ड) | **संघासाठी साहित्य** | |
| १ | १ लॉन टेनिस रॅकेट रु. ५,०००/- प्रमाणे. (सिंगल ) | ५,०००/- |
| २ | १ लॉन टेनिस रॅकेट रु. ५,०००/- प्रमाणे. (डबल) | ५,०००/- |
| इ) | **वैयक्तिक क्रीडा साहित्य होणारा खर्च :-** | |
| १ | ४ ट्रॅकसूट रु. ५००/- प्रमाणे. | २,०००/- |
| २ | ४ किटबॅग प्रत्येकी रु.५००/- प्रमाणे. | २,०००/- |
| ३ | १६ टि शर्टस् रु. ५००/- प्रमाणे. | ८,०००/- |
| ४ | १६ शॉटर्स रु. ५००/- प्रमाणे. | ८,०००/- |
| ५ | ९ जोडी पायमोजे प्रत्येकी रु. ५०/- प्रमाणे. | ४५०/- |
| ६ | ९ बूटांचे जोड प्रत्येकी रु.७००/- प्रमाणे. | ६,३००/- |
| ७ | ७ जोडी निकॅप रु. १५०/- प्रमाणे. | १,०५०/- |
| ८ | ७ रस्टबॅण्डरु. १५०/- प्रमाणे. | १,०५०/- |
| ९ | ७ हेड बॅण्ड रु. १५०/- प्रमाणे. | १,०५०/- |
| १० | ७ सपोटर्स रु. ३००/- प्रमाणे. | २,१००/- |
| ११ | व्यवस्थापक श्री. प्रकाश चौधरी निवृत्त असून सचिवालय जिमखान्याचे पदाधिकारी आहेत. त्यांना प्रवास खर्च व दैनिक भत्ता म्हणून ९ दिवसांकरता | ५,०००/- |

| | | |
|---|---|---|
| **फ)** | **प्रथमोपचाराकरिता खर्च.** | |
| | ग्लुकोज/ औषधे/स्प्रे इत्यादीसाठी खर्च. | १,०००/- |
| | **एकूण रुपये :- (रु. पासष्ट हजार नऊशे फक्त)** | **६५,९००/-** |

Charushila D Chaudhari

Digitally signed by Charushila D Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b99d7dca0e63be1bd1b7158b9523537dcc1d46bc807768647a9ed4ff3816ecf3, cn=Charushila D Chaudhari
Date: 2016.12.05 16:50:55 +05'30'

**( चारुशीला चौधरी )**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

विवरणपत्र - क

दिनांक ५ ते ११ डिसेंबर, २०१६ या कालावधीत जयपूर राजस्थान येथे आयोजित करण्यात आलेल्या अखिल भारतीय नागरी सेवा लॉन टेनिस स्पर्धा २०१६-१७ मध्ये भाग घेणाऱ्या महाराष्ट्र शासनाच्या लॉन टेनिस संघाची निवड करण्यासाठी दि. २५ नोव्हेंबर, २०१६ रोजी निवड चाचणीसाठी उपस्थित राहिलेले अधिकारी कर्मचारी खेळाडूंची नावे विवरणपत्र.

| क्र. | खेळाडूंचे नाव व पदनाम | विभाग / कार्यालय |
|---|---|---|
| १ | श्री. नरेंद्र सोपल,सह संचालक | आयुक्त, क्रिडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे. |
| २ | श्री. प्रकाश इंगोळे, उपसचिव | सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२. |
| ३ | श्री. प्रभाकर बा. गावडे, उपसचिव | आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२. |
| ४ | श्री. उल्हास फुलझेले,शाखा अभियंता | मृद यांत्रिकी रेफरळ प्रयोगशाळा, मेरी, नाशिक, जि. नाशिक. |
| ५ | श्री. तानाजी शिन्दे, अतिरिक्त आयुक्त | पिंपरी चिंचवड म्युनिसिपल कॉर्पोरेशन, पुणे. |
| ६ | श्री. संजय पाटील, उप जिल्हाधिकारी | आयुक्त, भूसंपादन कार्यालय क-१३, पुणे. |
| ७ | श्री. राजाराम शि. देवकर, प्रतिवेदक | अधिपरिक्षक, पुस्तके व प्रकाशने, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, जुने जकात घर, फोर्ट, मुंबई. |
| ८ | श्री. प्रशांत का. मेंगळ, टेनिस बॉय | राज्यपालाचे परिवार प्रबंधक कार्यालय, राजभवन, वाळकेश्वर, मुंबई. |
| ९ | श्री. सागर शिंदे | गोदावरी कालवा आधुनिकीकरण उपविभाग, नाशिक, जिल्हा - नाशिक. |
| १० | श्री. जी.बी. नन्नोर | लघु पाटबंधारे विभाग ॥, संगमनेर (घुलेवाडी) |
| ११ | श्री. सुरेश गायकवाड | मानद सभापती, सचिवालय जिमखाना, मुंबई- ४०० ०३२ |
| १२ | श्री. प्रकाश ह. चौधरी, | मानद सह सचिव, सचिवालय जिमखाना, मुंबई- ४०० ०३२. |
| १३ | श्री. अशोक पाडावे, सहाय्यक | अवर सचिव (आस्थापना), सहकार विभाग, मंत्रालय, |

Charushila D Chaudhari

Digitally signed by Charushila D Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b99d7dca0e63be1bd1b7158b9523537dcc1d46bc807768647a9ed4ff3816ecf3, cn=Charushila D Chaudhari
Date: 2016.12.05 16:51:07 +05'30'

( चारुशीला चौधरी )
उपसचिव, महाराष्ट्र शासन